भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) पदावरील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन आदेश क्रमांकः न्यायाप्र २०१४/प्र.क्र.२३७/पापु-१५

गो. ते. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१

तारीख: ९ जूलै, २०१५

वाचा :-

१) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आपना १३१३ / प्र.क्र.१८७/पापु-१५, दिनांक ३/९/२०१३**

२) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आपना १३१३ / प्र.क्र. ३७९/पापु-१५, दिनांक २९.१०.२०१३**

३) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आपना २०१४ / प्र.क्र.८९/पापु-१५, दिनांक १२.९.२०१४**

प्रस्तावना :-

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील श्रीमती व्ही. आर. चौहान, कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) , ग्रामिण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, चंदपूर यांची संदर्भाधिन क्र. १ येथील शासन निर्णयानुसार जिल्हा परिषद, गडचिरोली येथे बदली करण्यात आली होती. सदर बदली आदेशास संदर्भाधित क्र. २ येथील शासन निर्णयानुसार स्थगिती देण्यात आली होती. तसेच संदर्भाधिन क्र. ३ येथील शासन निर्णयानुसार संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन आदेश रद्द करुन श्रीमती व्ही. आर. चौहान, कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) , ग्रामिण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, चंदपूर येथून जिल्हा परिषद, गडचिरोली येथे बदली करण्यात आली होती. तथापि श्रीमती व्ही. आर. चौहान यांनी त्या विरोधात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे मुळ अर्ज क्र. ६६३/२०१४ दाखल करुन शासनाच्या दिनांक १२.९.२०१४ च्या आदेशास आव्हान दिले होते. सदर मुळ अर्जावर मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक २५.२.२०१५ रोजी अंतिम आदेश दिले असून मा. न्यायाधिकरणाचे शासनाचे

दिनांक ३.९.२०१३ व दिनांक १२.९.२०१४ चे आदेश रद्दबातल केले आहेत. तसेच सन २०१५ च्या सर्वसाधारण बदल्यांमध्ये त्यांची बदली करण्यास शासनास पर्याय खुला ठेवला आहे. मा. न्यायाधिकरणाचे आदेश विचारात घेऊन श्रीमती व्ही. आर. चौहान, कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) यांचे ग्रामिण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, चंदपूर येथून जिल्हा परिषद, गडचिरोली येथे बदली करण्याबाबत दिनांक ३.९.२०१३ व दिनांक १२.९.२०१४ चे आदेश रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन आदेश:-**

श्रीमती व्ही. आर. चौहान, कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) यांचे ग्रामिण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, चंद्रपूर येथून जिल्हा परिषद, गडचिरोली येथे बदली करण्याबाबत दिनांक ३.९.२०१३ व दिनांक १२.९.२०१४ चे आदेश याव्दारे रद्द करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०९१४४६५८९२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.07.09 15:26:52 +05'30'

**( प्रमोद गि. कानडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, नागपूर
३. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
४. संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत)
५. निवडनस्ती (पापु-१५)